**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत कार्यरत जिल्हा परिषदेच्या जिल्हा कक्षातील अधिकारी व कर्मचारी, ग्रामिण व नागरी प्रकल्पातील अधिकारी व कर्मचारी यांच्या वेतनाकरिता विधानमंडळाच्या डिसेंबर, २०१६ च्या अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित केलेला निधी वितरित करण्यास मंजुरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. मबाआ-२०१६/प्र.क्र.१८४/का-७**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
दिनांक : ३१ मार्च, २०१७

<u>वाचा:</u>-१) वित्त विभाग, शासन निणर्य क्र.पूरक-२०१६/प्र.क्र.२०१/अर्थसंकल्प-३, दि.०४.०१.२०१७.
२) महिला व बाल विकास विभाग, शा.नि. बीजीटी-२०१६/प्र.क्र.४८/का-४, दि.०९.०१.२०१७

<u>प्रस्तावना</u>:-

महिला व बाल विकास विभागांतर्गत आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांचे अंतर्गत कार्यरत जिल्हा परिषदेच्या जिल्हा कक्षातील अधिकारी व कर्मचारी, ग्रामिण व नागरी प्रकल्पातील अधिकारी व कर्मचारी यांच्या वेतनाकरिता विविध लेखाशिर्षांतर्गत केंद्र हिश्शाकरिता रु. १३००.०० लक्ष व राज्य हिश्शाकरिता लेखाशिर्षांतर्गत रु. २२००.०० लक्ष इतक्या अतिरिक्त नियतव्ययाची पुरवणी मागणी डिसेंबर, २०१६ च्या पावसाळी अधिवेशनात मंजूर झाली आहे. त्यास अनुसरुन निधी वितरणाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

<u>शासन निर्णय -</u>

१. महिला व बाल विकास विभागाच्या अर्थसंकल्प कार्यासनाने निर्गमित केलेल्या दिनांक ०४.०१.२०१७ च्या शासन निर्णयान्वये डिसेंबर, २०१६ मध्ये पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित केलेला निधी वितरीत करण्यासाठी नियोजन व वित्त विभागाकडे सादर करण्यात आला होता. नियोजन विभाग व वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार सोबत जोडलेल्या विवरणपत्र १ व २ मध्ये नमुद केलेल्या लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्पित केलेला निधी खालील अटी / शर्तीच्या अधीन राहून आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना वितरित करण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

१. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रात येणाऱ्या अंमलबजावणी अधिकाऱ्यांना निधी वितरीत करताना तो जिल्हानिहाय वितरीत केल्याचे आदेश निर्गमित करुन निधी वितरीत करावा.
२. नियोजन व वित्त विभागाने यापूर्वी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित निकष, वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन तसेच वित्त विभागाच्या दि. २० एप्रिल, २०१६ च्या परिपत्रकातील अटी व शर्तीचे व वेळोवेळी दिलेल्या सुचनांचे पालन करुन निधी वितरणाबाबतची कार्यवाही करावी.

२. सदरचा शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.५९/१४७२, दिनांक २२.०३.२०१७ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. ८४/१७/व्यय-६, दिनांक ३०.०३.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळाद्वारे उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१७०३३११७२८४०८८३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2017.04.01 16:36:13 +05'30'

सोबत : विवरणपत्र १ व २

**(ला. रा. गुजर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
२. महालेखाकार (स्थानिक निकाय लेखापरिक्षा व लेखा), प्रतिष्ठा भवन, १०१,महर्षी कर्वे रोड, मुंबई
३. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
५. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
६. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
७. वित्त विभाग (व्यय/६,अर्थसंकल्प-७), मंत्रालय,मुंबई
८. उप सचिव (श्री.गुजर/श्रीम. निवतकर), महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
९. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
१०. निवड नस्ती कार्यासन ७

## महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. मबाआ-२०१६/प्र.क्र.१८४/का-७ दिनांक ३१ मार्च, २०१७

विवरणपत्र-१

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | राज्य योजना | पुरवणी मागणी बाब क्रमांक | पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित केलेला निधी | खर्च करण्यास मंजूरी दिलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| **मागणी क्र. एक्स-१, (१) २२३६, पोषण आहार, ०२,पोषक अन्न व पेय वितरण, १०१ विशेष पोषण आहार कार्यक्रम** | | | | | |
| (०४) केंद्रपुरस्कत योजना<br>(०४)(०६) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम,१९६१ याच्या कलम १२३ व २६१ अन्वये एकात्मिक बाल विकास सेवा प्रकल्पाच्या आस्थापनाविषयक बाबींसाठी जिल्हा परिषदांना अनुदान (राज्य हिस्सा (२२३६ १३७३) (योजनांतर्गत ) | २२३६ १३७३ | राज्य हिस्सा | २४० | रुपये<br>३६,सहायक अनुदाने (वेतन) १६,९९,०३,०००/- | रुपये<br>१६,९९,०३,००००/- |
| २२३६, पोषणआहार<br>(०५)(०५) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (ग्रामिण) (राज्य हिस्सा) (२२३६ १४०८)<br>योजनांतर्गत | २२३६ १४०८ | राज्य हिस्सा | २४० | ०१ वेतन ४,१७,०७,०००/- | ४,१७,०७,०००/- |
| २२३६, पोषणआहार<br>राज्य योजनांतर्गत योजना<br>(०१)(०२) एकात्मिकृत बाल विकास सेवा आयुक्तालयाचे बळकटीकरण (राज्य हिस्सा) (२२३६ १३६४)<br>योजनांतर्गत | २२३६ १३६४ | राज्य हिस्सा | २४० | ०१ वेतन ८३,९०,०००/- | ८३,९०,०००/- |
| | | | **एकूण** | २२,००,००,०००/- | २२,००,००,०००/- |

## महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र. मबाआ-२०१६/प्र.क्र.१८४/का-७ दिनांक ३१ मार्च, २०१७

विवरणपत्र-२

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | राज्य योजना | पुरवणी मागणी बाब क्रमांक | पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित केलेला निधी | खर्च करण्यास मंजूरी दिलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| **मागणी क्र. एक्स-१, (१) २२३६, पोषण आहार, ०२,पोषक अन्न व पेय वितरण, १०१ विशेष पोषण आहार कार्यक्रम** | | | | | |
| (०४) केंद्रपुरस्कत योजना (०४)(०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ याच्या कलम १२३ व २६१ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदान (स्थानिक क्षेत्र) (केंद्र हिस्सा ) (२२३६ ००७२) (योजनांतर्गत ) | २२३६ ००७२ | केंद्र हिस्सा | २४० | रुपये<br>३६,सहायक अनुदाने<br>(वेतन) ९,६५,४३,०००/- | रुपये<br>९,६५,४३,०००/- |
| (०५) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (०५)(०४) एकात्मिक बाल विकास सेवा योजना ( केंद्र हिस्सा ) (ग्रामीण) (योजनांतर्गत ) (२२३६ १३९१) | २२३६ १३९१ | केंद्र हिस्सा | २४० | ०१ वेतन २,८९,५७,०००/- | २,८९,५७,०००/- |
| ८०-सर्वसाधारण ००१ संचालन व प्रशासन (०१) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (०१)(०१) एकात्मिक बाल विकास सेवा योजना संचालनालय ( केंद्र हिस्सा) (योजनांतर्गत ) (२२३६ ०३७७) | २२३६ ०३७७ | केंद्र हिस्सा | २४० | ०१ वेतन ४५,००,०००/- | ४५,००,०००/- |
| | | | **एकूण** | १३,००,००,०००/- | १३,००,००,०००/- |